प्रकरण सातवें.

# राजेंद्रबाबूंचे कांहीं उद्‌बोधक विचार.

## हल्लींची शिक्षण पद्धति

मुंगेर येथें भरलेल्या बिहारी विद्यार्थ्यांच्या संमेलनांत राजेंद्रबाबूंनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत पुढील उद्गार काढलेः—

" आपल्या पूर्वकालीन संस्कृतिप्रमाणें पाहिलें तर आपल्या विद्यार्थी वर्गाचें जीवन हल्लींपेक्षांही अगदीं साधें व गरीबीचें असावयास पाहिजे. साधी रहाणी व उच्च विचारसरणी ही आपल्या संस्कृतीची शिकवण आहे. व आपल्या शिक्षणाचें हेंच ध्येय आहे. हल्लींच्या शाळांचे संसार सुरू होण्यापूर्वीं कित्येक वर्षें पाठशाळेंतील विद्यार्थी वटवृक्षांच्या छायेंत बसून आपल्या गुरुजनांकडून पाठ घेत असत. त्यावेळीं विद्यार्थ्यांना शिक्षण देण्याला येवढी साधन सामुग्री पुरेशी होई. माझ्या म्हणण्याचा असा अर्थ नाहीं कीं पूर्वींचीच साधीसुधी पद्धत आतां पुन्हां सुरू करावी. त्या गोष्टीची शक्यताही नाहीं. पण आपण आपल्या शाळेंतून जें विलासी वातावरण सुरू केलें आहे तें त्वरित बंद करणें आवश्यक आहे. शाळा कॉलेजांत असतांना मोठमोठ्या राजभुवनांत रहावयाचें व सुखोपभोगांत जीवन घालवावयाचें आणि

शिक्षणक्रम संपला कीं परत आपल्या कंगाल झोंपडींत रहावयाला याचें. अशा पद्धतीनें जीवन सुखी होईल कीं दुःखी होईल ?...... सध्यांच्या शाळेचा शिक्षणक्रम पाहिला तर मुळाक्षरें शिकण्यापासून मॅट्रीक होईतों किमान १२ वर्षांचा आहे व पुढें कॉलेजांत ४ वर्षें मिळून १६ वर्षें पदवी संपादन करावयाला लागतात. हिंदी लोकांचें दरिद्री जीवन व त्यांचें अत्यंत कमी आयुर्मान या गोष्टींचा विचार केला तर आपलीं मुलें मिळवतीं होईपर्यंत त्यांना इतकीं वर्षें शाळा कॉलेजांत काढावयाला लागावीं, हें कोणा पालकांना पसंत पडेल ? हिंदुस्थानांतलें युनिव्हर्सिटीचें शिक्षण म्हणजे वास्तविक पहातां उपजीविकेचें साधन आहे. युरोपांतल्या युनिव्हर्सिटयांचें शिक्षण याहून अगदीं भिन्न आहे. तिकडे शिक्षणाचें ध्येय अत्यंत उच्च असून तेथें संशोधनकार्याला प्रोत्साहन दिलें जातें. पोट भरण्याचें साधन हेंच हिंदी शिक्षणाचें ध्येय आहे. पाश्चात्य देशांतील उच्च शिक्षणक्रम आपल्याकडेही सुरू करतां येणें अशक्य नाहीं हें मी तुम्हांस सांगू इच्छितों. मात्र हिंदी मातापित्यांनीं तें मनावर घेतलें पाहिजे. आपल्या ३५ वर्षांच्या अल्प आयुर्मर्यादेंत केवळ शिक्षणाला २० वर्षें खर्च करणें उत्तरोत्तर कठीण होत जाणार आहे, याचा अवश्य विचार केला पाहिजे."

## मातृभाषेंतील शिक्षण.

पाटणा युनिव्हर्सिटीच्या कार्यकारी सभेंत देशी भाषांच्या माध्यमाचा पुरस्कार करतांना राजेंद्रबाबू म्हणाले:—

"गेल्या पन्नास वर्षांत मातृभाषा हें जर शिक्षणाचें माध्यम असतें तर मध्यम वर्गांत शिक्षणाचा खूप प्रसार झाला असता. परकीय भाषा मुळांतच कठीण असल्यामुळें तिच्या द्वारां सर्व विषय शिकावयाचे म्हणजे विनाकारण पुष्कळ काळ व्यर्थ जातो. हा व्यर्थ जाणारा वेळ

जर वांचविला आणि इंग्रजी शिक्षणाच्या कामीं खर्च केला, तर इंग्रजीबरोबर इतर विषयांचाही चांगला अभ्यास होईल. राष्ट्रीय दृष्टीनें विचार केला तर माझें असें म्हणणें आहे कीं किमान मॅट्रीकपर्यंत तरी मातृभाषा हें शिक्षणाचें माध्यम असावें......राष्ट्रीय शिक्षण व राष्ट्रीय भाषा या दोन्ही गोष्टी एकमेकांच्या पूरकच आहेत. जोंपर्यंत ज्ञान हें परकीय भाषेंत गुरफटलेलें आहे, तोंपर्यंत फारच थोड्यांना त्याचा उपयोग होणार. परकीय भाषा शिक्षणाचें माध्यम कधींही होऊं शकणार नाहीं. देशांतील बहुजन जनसमाजाला त्या भाषेंतील साहित्य मिळूं शकणार नाहीं. व उपयोगीही पडणार नाहीं. देशी भाषांना माध्यम बनविण्यांत क्वचित् थोडी गैरसोय होण्याचा संभव असेल, पण त्यासाठीं शिक्षणाच्या आदर्शाला कां तिलांजली द्यावयाची ? या जगांत अत्यंत हीन व अधम दर्जाची कोणती गुलामगिरी असेल तर ती बौद्धिक गुलामगिरी होय. माझी हिंदी राष्ट्राला नम्रतापूर्वक विनंति आहे कीं, त्यानें पाहिल्या प्रथम या बौद्धिक गुलामगिरींतून स्वतःची मुक्तता करावी. याचबरोबर इंग्रजांनाही माझी विनंति आहे कीं, त्यांनीं हिंदी जनतेला यासंबंधांत सहाय्य करावें. आम्ही हिंदी लोक इंग्रजी वाङ्मयाचे ऋणाईत आहोंत, पण शिक्षणाचें माध्यम जर इंग्रजी नसतें, तर आमचें हिंदी जीवन अधिक उदात्त व अधिक उच्च झालें असतें. व हिंदी लोक वर्णानें व स्वभावानें भारतीय असले तरी विचारानें युरोपियन आहेत, असें म्हणण्याचा लॉर्ड मेकालेवर प्रसंग आला नसता. जोंपर्यंत आपल्याजवळ बौद्धिक स्वातंत्र्य नाहीं तोंपर्यंत केवळ पुस्तकी ज्ञानाचा मुळीसुद्धां उपयोग नाहीं. माझी दृष्टि हिंदी राष्ट्राच्या भविष्यावर खिळली आहे. ज्या दिवशीं शिक्षणक्रमांत देशी भाषांचें माध्यम सुरू होईल त्या वेळीं हिंदी राष्ट्राचें पाऊल प्रगतिपथावर पडलेंच म्हणून समजावें. या दिवसाची मी मोठ्या उत्कंठेनें वाट पहात आहे. ''

## राष्ट्रीयत्व व साहित्य

कोकोनाडा येथें भरलेल्या अखिल भारतीय हिंदी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत राजेंद्रबाबूंनीं पुढील उद्गार काढले:—

" राष्ट्रीयता का भाषा और साहित्यके साथ बहुतही घनिष्ट और गहरा सम्बन्ध है। किसी जाति या राष्ट्रका विकास उसकी भाषा और साहित्य के विकास के साथही साथ होता है। किसी साहित्य की अवनति उस जाति के पतन का अटल और अटूट प्रमाण है।... महाभारत रामायण और उपनिषद् अवश्य ऐसे समय में लिखे गये थे जब यह देश बहुत उन्नत था। जब बौद्धो का साम्राज्य भारतकी एक छोर से दुसरी छोर तक पहुंचा और उनका प्रभुत्व तथा गौरव भारतवर्ष के बाहर भी पहुंच गया तो पाली भाषा और पाली साहित्य की उन्नति भी उस साम्राज्यकी उन्नति के साथ ही साथ बढती गयी,—फिर बौद्ध धर्म और बौद्ध साम्राज्य के ह्रास के उपरान्त जब वैदिक धर्म और वैदिक जाति का उत्थान हुआ तब संस्कृत भाषा और संस्कृत का भी उत्थान हुआ। उसी समय कालिदास, बाणभट्ट जैसे कविपुंगव हुए थे। मृच्छकटिक, कादम्बरी, और मुद्राराक्षस की रचना भी उसी समय हुई थी। इसी प्रकार यदि हिन्दी साहित्य का भी इतिहास देखा जाय तो मालूम होगा कि चन्दबरदाई की काव्यरचना, हिन्दुओंके सिरताज तथा हिन्दुधर्म के प्राण प्रथ्वीराजके समय और भूषण कवि का सम्मान शिवाजी के दरबार में हो सकता था। भारतवर्ष की प्रादेशिक भाषाओंका साहित्य भी यही बताता है कि जहां जिस प्रान्त में जिस भाषा के बोलनेवालों के बीच राष्ट्रीय भाव जागृत हुआ है, उसी भाषा का आधुनिक साहित्य भी उन्नति के शिखर की ओर अग्रसर हुआ है। बंगला, गुजराती और मराठी साहित्य इस बातके प्रमाण हैं। ग्रीस जब बहुत उन्नत था उसी समय वहां के इतिहास, दर्शन, कविता तथा नाटक आदिमें अत्यन्त

सुंदरता और गांभीर्य पाया जाता है। जब इस्लाम का आधिपत्य एशिया, आफ्रिका और युरोप के हिस्सों में हुआ था उस समय उसका साहित्य भी बहुत उन्नति कर गया था। इतिहास में इस बात के भी उदाहरण मौजुद है कि अन्य देशीय राजा के विरुद्ध पददलित जनता ने ऊठ खडी होने की चेष्टा और स्वराज्य स्थापित करनेका सर्व प्रथम प्रयत्न अपनी भूली हुई भाषा और विस्तृत साहित्य का सहारा लेकर ही किया है। यह एक जानी हुई बात है कि जब एक देश दुसरे देशपर अपना आधिपत्य जमा लेता है, तब उस आधिपत्य को स्थायी बनाने के लिये वह विजित प्रजा के विचारों तथा भावों को इस प्रकार बदल देना चाहता है जिसमें वह अपने गौरव को भूल जावे और केवल विजता के ही गौरव तथा महत्ता की स्मृति को रख सके।...अंग्रजी राज्य ने अपना प्रभाव हमारे जीवन के हरएक कोने कोने में पहुंचाया। यद्यपि अंग्रेजी शिक्षा और अंग्रेजी भाषा का विस्तार इतना अधिक नहिं हुआ है जितका हो सकता था फिर भी उसका प्रभाव गहरा पडा, उसीका फल है कि आज अंग्रेजी शिक्षित समाज दुर्बल और परावलंबी हो रहा है—वह अंग्रेजी सभ्यता, अंग्रेजी प्रतिभा, अंग्रेजी शक्ति, अंग्रेजी साहित्य और अंग्रेजी गौरव के भावसे इतना दब गया है कि वह आपने देशके इतिहास, साहित्य और शक्तिपर भरोसा नहीं कर सकता।...विजित जातियोंने स्वराज्य के संग्राम में पहले विजेता के मानसिक आधिपत्य से अपनेको छुडाने का प्रयत्न किया है इसके उदाहरण स्वरूप हंगेरी और आयर्लंड के इतिहास मौजूद है।"

## न्यायकोर्ट व वकील

"आपल्याकडे न्यायकोर्ट हें एक मोठ्या खर्चाचें प्रकरण होऊन बसलें आहे. या कोर्टाचा व्यवहार व न्यायदानाची पद्धत ही इतकी खर्चाची असते कीं ज्याच्या बाजूनें निवाडा होतो त्याला सुद्धां कधीं

कधीं आपली मालमत्ता गहाण टाकावी लागते. कोर्टांत न्याय मिळविण्यासाठीं जबर कोर्ट फी द्यावी लागते, वकिलाच्या डोक्यावर पैशाचा पाऊस पाडावा लागतो व कोर्टाशीं संबंध असलेल्या अलबत्या गलबत्यांना चिरीमिरी द्यावी लागते. आणि इतकेंही करून जो मानसिक व शारीरिक त्रास होतो, त्याला मोलच नाहीं. न्यायकोर्टांत न्यायाधीशापुढें जीं कामें चालतात, त्यांत न्यायनिवाड्यापेक्षां पुढें असलेल्या कामांचा झटपट निकाल लावण्याकडे न्यायमूर्तींचें अधिक लक्ष असतें. कारण कामाचा झटाझट निकाल लावून आपलें टेबल साफ ठेवणाऱ्या न्यायाधीशांना बढतीची सर्वांत जास्त खात्री असते. अशा परिस्थितींत खऱ्या न्यायाची कशी अपेक्षा करतां येणार? कोर्टाच्या कामाच्या विलंबाबद्दल तर बोलावयासच नको. कित्येक क्षुल्लक खटले वर्षानुवर्षे चालत असतात, तर मोठ्या खटल्यांना किती वर्षें लागत असतील तें सांगणें नकोच. आणि इतक्या विलंबानंतर न्याय मिळेल असेंही नाहीं. कोर्टापुढें आलेल्या खटल्यांपैकीं शें. २५ ना तरी न्याय मिळत असेल किंवा नाहीं याची शंका आहे. तेव्हां अशा परिस्थितींत कोर्टबाजी ही जुगार आहे असें म्हटल्यास काय हरकत आहे? तुमची बाजू कितीही न्याय्य व सत्य असली तरी कोर्टांत तुमच्या बाजूनें निकाल होईल, असें समजण्यांत अर्थ नाहीं. या गोष्टीला अर्थात् वकीलही बरेच जबाबदार असतात. कारण एकादा हुशार वकील असेल तर तो वाटेल तसला अन्यायाचा खटला जिंकूं शकतो. खऱ्याचें खोटें करणें किंवा खोट्याचें खरें करणें हें वकिलाच्या करामतीला सहज साध्य असतें. हल्लींच्या न्यायपद्धतीचा व कोर्टबाजीचा सर्वांत मोठा दुष्परिणाम जर कोणता झाला असेल तर तो जनतेची नीतिमत्ता खालावण्यांत झाला आहे. हल्लींचीं कोर्टें जनतेचा नैतिक अधःपात घडवून आणीत आहेत असें स्पष्ट म्हणण्यास हरकत नाहीं."

('यंग इंडिया'—६-१०-१९२०

## चम्पारण्यांत महात्मा गांधी

'चम्पारण्यांतील सत्याग्रह' या पुस्तकांत महात्माजींसंबंधीं लिहितांना राजेंद्रबाबू म्हणतात:—"जनतेची सेवा कशी करावी ते महात्माजींनीं आम्हांला येथें शिकविलें. आमच्यापुढें जणूं काय त्यांनीं एक नवेंच विश्व उभविलें. त्यांच्या हाताखालीं काम करण्याचें भाग्य ज्यांना लाभलें त्यांना महात्माजींनीं नवीन दृष्टी दिली. त्यांच्यांत नवीन चैतन्य ओतलें. आम्ही महात्माजींपाशीं जेव्हां जेव्हां स्वराज्याच्या प्रश्नाबद्दल बोलत असूं, तेव्हां तेव्हां ते म्हणत कीं आपण स्वराज्याचेंच काम करीत आहों. त्यांच्या म्हणण्याचा आशय त्यावेळीं आमच्या ध्यानांत आला नाहीं, हें मी कबूल करतों. पण आज चम्पारण्यांतील काम पूर्ण झाल्यावर मला त्यांच्या म्हणण्याचा अर्थ पूर्णपणें कळत आहे. चम्पारण्यांतील काम हें खरोखर स्वराज्याचेंच काम आहे याची आतां माझी पूर्ण खात्री पटली आहे. चम्पारण्याकडे जातांना मुझफरपूरजवळ महात्माजींना एक खेडें लागलें. त्या खेड्यांतील लोकांची दुःस्थिति पाहून महात्माजी उद्गारले कीं ' या लोकांची स्थिति सुधारली कीं स्वराज्य मिळालेंच म्हणून समजा!' या लोकांची परिस्थिति सुधारण्याच्या हेतूनेंच त्यांनीं चम्पारण्यांत विधायक कार्य सुरू केलें. या कामासाठीं जितके स्वयंसेवक मिळतील तितके हवेच होते, पण जे स्वयंसेवक मिळाले ते सर्वच लायक नव्हते. सत्यानें व निर्भयतेनें वागणारे व दारिद्र्याचा अंगीकार करणारे असे स्वयंसेवक महात्माजींना या कार्यासाठीं पाहिजे होते. महात्माजींनीं आपल्या सहकाऱ्यांना ही शिकवण देण्याचा विचार चालविला. आम्ही जेव्हां पहिल्यांदा चम्पारण्यांत प्रवेश केला, तेव्हां आमच्याबरोबर नोकर होते व आचारीही होता. हळूंहळूं पण लवकरच बहुतेक नोकरांना रजा देण्यांत आली व फक्त एक ठेवून घेतला. याचा परिणाम असा झाला कीं ज्यांनीं आजन्मांत एकादा हातरुमाल सुद्धां

धुतला नव्हता किंवा विहिरींतून एक तांब्याभर पाणीसुद्धां काढलें नव्हतें, त्यांच्यावर कपडे धुण्याचा व भांडीं घासण्याचा प्रसंग येऊन ठेपला. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, महात्मा गांधींच्या प्रभावानें आम्ही वाटेल तीं कामें करूं लागलों. आमच्या स्वावलंबनाला सीमाही राहिली नाहीं. खोल्या झाडून अंगण साफसूफ करणें, भांडीं घांसणें, स्टेशनवरून सामानाची नेआण करणें, इत्यादि अंगमेहेनतीचीं कामें आम्ही बिनहरकत करूं लागलों. हीं कामें करण्यांत आम्हांला कांहीं वाटेनासें झालें. आचाऱ्याला परत धाडल्यावर श्रीमती कस्तुरबाई गांधीनीं स्वयंपाकाचें काम आपल्या हातीं घेतलें व त्या सर्वांना मोठ्या प्रेमानें व वात्सल्यानें वाढीत असत. महात्माजींच्या सहवासाचा आमच्यावर एवढा परिणाम झाला कीं आगगाडीच्या तिसऱ्या वर्गांतून प्रवास करण्यांत आम्हांला मुळींच कमीपणा वाटेनासा झाला. त्यांचा साधेपणा, स्वदेशीचा बाणा व त्यागवृत्ति या गोष्टींचा आमच्यावर इतका परिणाम झाला कीं त्यायोगें आमच्या जीवनाला एक निराळीच दिशा लागली. महात्माजींच्या चारित्र्याचा व साधेपणाचा परिणाम सबंध बिहार प्रांतावरच झाला असें म्हटल्यास चालेल. दक्षिण आफ्रिकेनंतर हिंदुस्थानांत येऊन महात्माजींनीं जर कोणतें मोठें कार्य हातीं घेतलें असेल व यशस्वितेनें पार पाडलें असेल तर हें चंपारण्याचें होय. कोणतेही कार्य हातीं घेतलें असतां त्यांत सिद्धि कशी मिळवावी, हें चम्पारण्यावरून महात्माजींनीं आपल्या देशबांधवांना दाखवून दिलें.... महात्मा गांधी चम्पारण्यांत राहिल्यानें चम्पारण्याचा केवढा फायदा झाला व आजूबाजूच्या प्रदेशावर केवढा परिणाम झाला त्याची येथें यथार्थ कल्पना देणें शक्य नाहीं. चम्पारण्यांतील कामगिरीनें महात्माजींनीं हिंदुस्थानला वाटेल तें ध्येय साध्य करून घेण्याचा एक नवाच मार्ग दाखविला. त्यांनीं चम्पारण्यांत जें बीज लावलें त्याला कोंब फुटत आहेत तें आपण प्रत्यक्षच पहात आहों.

महात्माजींनीं हें बीज केवळ चम्पारण्यांत पेरलें नसून सबंध हिंदुस्थानभर पेरलें आहे. या बीजाचें झाड होण्यास व त्याला फुलेंफळें येण्यास अद्यापि बराच अवधि आहे. पण हा वृक्ष फलपुष्पांनीं भारावल्याखेरीज रहाणार नाहीं. या बीजाला सध्यां जे धुमारे फुटले आहेत, व फुटत आहेत त्यावरून जर कल्पना केली तर हिंदी राष्ट्रांत लवकरच नव विचारांचा व आकांक्षांचा अरुणोदय होणार आहे, असें भाकीत करावयाला मुळींच हरकत वाटत नाहीं. हिंदी स्वराज्याचें बीज खरोखर पहा तां चम्पारण्यांतच पेरलें गेलें आहे. आणि मळेवाल्यांच्या व भांडवलशाहीच्या पायदळीं उडविल्या गेलेल्या गरीब बिचाऱ्या मजुरांना या लढ्यांत जसा विजय मिळाला त्या विजयाप्रमाणेंच हिंदी जनतेला स्वातंत्र्याच्या लढ्यांत यशप्राप्ति होवो, अशी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे. ''

## गांधीजींचें राष्ट्रकार्य

स्वराज्यप्राप्तीसाठीं सत्याग्रह, असहकार, कौन्सिलें, हिंदुमुसलमानांचें ऐक्य इत्यादि कोणत्याही प्रकारचा कार्यक्रम आंखण्यांत आला तरी हरकत नाहीं, मात्र तो आंखताना प्रत्येकानें एक ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं सेवा आणि त्याग या दोन मार्गांशिवाय स्वातंत्र्य मिळणें शक्य नाहीं. परकी राज्यकर्ते कांहींही करोत, हिंदुस्थान जर सुसंघटित, एकनिष्ठ, शीलवान् व दृढनिश्चयी होईल तर हिंदुस्थानला स्वराज्य दिल्याशिवाय इंग्लंडला गत्यंतरच उरणार नाहीं. राष्ट्राच्या अंतःकरणांत तेज, चैतन्य, निश्चय, शील व कर्तृत्व रुजविण्याचें कार्य महात्माजींनीं चालविलें आहे. '' ( ' यंग इंडिया ' लेखसंग्रहाची प्रस्तावना. )

## खादी

" ज्या राष्ट्राला आपल्या स्वतःच्या अन्नवस्त्रासाठीं दुसऱ्यावर अवलंबून रहावें लागतें, त्याची शंभर वर्षे भरण्यास वेळ लागत नाहीं.

गेलीं ५०—६० वर्षें परक्यांच्या आहारीं गेलेल्या हिंदुस्थानानें स्वावलंबन करून आपलें रक्षण केलें नाहीं तर त्याचें नष्टचर्य ओढवलें म्हणून समजावें. तथापि निराश होण्याचें कारण नाहीं. हळूंहळूं खादी हेंच प्रत्येकाचें वस्त्रप्रावरण होत आहे. खादीकडे लोकांचा विशेष ओढा लागत चालला आहे हें शुभचिन्ह आहे. याच वेगानें खादीची प्रगति होत गेली, तर प्राचीन काळचें वस्त्रस्वावलंबनाचें मनोहर दृश्य घरोघर दिसूं लागेल अशी आपण आशा करूं या. हिंदुस्थान हा नुसता राजकीय किंवा सामाजिक दृष्ट्याच नव्हे तर तो आर्थिक व औद्योगिक दृष्ट्याही स्वतंत्र झाला पाहिजे. " ( ' खादीचें अर्थशास्त्र' )

## काँग्रेस व जातीय निवाडा.

पाटणा येथें निघणाऱ्या ' हिंदुस्थान रिव्ह्यू ' या मासिकाच्या सप्टेंबर१९३४ अंकांत राजेंबाबूंनीं एक लेख लिहिला आहे.त्यांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे:—"जातीय निर्णयासंबंधीं वर्किंग कमिटीनें जो ठराव केला, तो अनेकांच्या टीकेस पात्र झाला आहे. हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा असल्यामुळें त्याच्यावर टीका होईल अशी कल्पना होतीच. तेव्हां या ठरावाविरुद्ध जे मुद्दे पुढें करण्यांत येत आहेत त्यांचा अगोदर विचार करणें जरूर आहे. काँग्रेस वर्किंग कामिटी कोणतीही गोष्ट अगदीं नव्यानें सुरू करील, हें आज तरी शक्य नाहीं. काँग्रेसनें आजपर्यंत असे अनेक ठराव केले आहेत, अशा अनेक सूचनांना व करारांना मान्यता दिली आहे, व स्वतःवर अशीं अनेक बंधनें घालून घेतलीं आहेत कीं काँग्रेसला त्यांतून मुक्त होतां येणें शक्य नाहीं. तसेंच नुसत्या आदर्श कल्पना किंवा आदर्श ध्येय काँग्रेसला अमलांत आणतां येतीलच असें नाहीं,हेंही ध्यानांत ठेवलें पाहिजे.काँग्रेस ही ज्या जनतेची प्रतिनिधि संस्था आहे, त्या जनतेच्या आकांक्षा व गरजा विचारांत घेऊन त्याप्रमाणें आपलें धोरण ठरविणें काँग्रेसला

भाग आहे, हें सांगणें नकोच. आणि हें धोरण ठरवितांना कॉँग्रेसला किती व कशा संकटांना तोंड द्यावें लागत आहे तें कॉँग्रेसलाच माहीत. कॉँग्रेसचा इतिहास जाणणाऱ्या प्रत्येकाला ठाऊक आहे कीं कॉँग्रेसनें १९१६ सालीं मुस्लीम लीगबरोबर करार केला. हा करार योग्य होता कीं अयोग्य होता हा प्रश्न निराळा. पण त्या वेळीं कॉँग्रेसनें मुसलमानांना स्वतंत्र मतदारसंघ दिले. हा लखनौ करार सरकारलाही स्वीकारार्ह वाटला व मॉंटेग्यु घटनेमध्यें त्याचा मुक्त हस्तानें उपयोग करून घेण्यांत आला. लखनौच्या कराराला संमति देणारा कॉँग्रेसचा ठराव अजून आहे तसा आहे. तो रद्द करण्यांत यावा, अशा तऱ्हेचा अद्यापिही ठराव पुढें आला नाहीं. तेव्हां कॉँग्रेस निरपवादपणें संयुक्त मतदारसंघाची पुरस्कर्त्री आहे, कॉँग्रेस आजपर्यंत फक्त संयुक्त मतदार संघालाच धरून बसली आहे, हें म्हणणें तितकेसें खरें नाहीं. तसेंच हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं आज जी वर्किंग कमिटी अधिकारारूढ आहे तिनें लखनौचा करार केला नाहीं.

अल्पसंख्यांक समाजाचे लोक कॉँग्रेसला येऊन मिळावेत, याबाबत कॉँग्रेसनें अगदीं पहिल्यापासून खटपट चालविली आहे. अमृतसर कॉँग्रेसच्या नंतरची ही गोष्ट नाहीं. त्याच्याही फार आधींची आहे. कॉँग्रेस आपल्या व्यवहारांत किंवा कार्यक्रमांत जातीजमातींना ओळखीत नाहीं, तिला जातगोत माहीत नाहीं, असें म्हणणेंही तितकेसें योग्य नाहीं. कॉँग्रेसचा आजपर्यंतचा असा शिरस्ता आहे कीं, जेव्हां एकाद्या धार्मिक किंवा सामाजिक प्रश्नांवर मतभेद उत्पन्न होतो, तेव्हां कॉँग्रेस तो प्रश्न बाजूलाच ठेवते. कॉँग्रेसनें जन्मापासून आपल्यापुढें पूर्ण राष्ट्रीयत्वाचें ध्येय ठेवलें होतें व तिनें जातिनिष्ठतेला कायमची मूठमाती देण्याचा वेळोवेळीं प्रयत्न केला आहे. या ध्येयाच्या आड येणाऱ्या सूचनांना किंवा मागण्यांना तिनें धुडकावून लावण्यासही कमी केलें नाहीं. सबंध देशाची प्रतिनिधी म्हणून असलेल्या व जनतेला राष्ट्रीय-

त्वाचें शिक्षण देण्यास धडपडणाऱ्या राष्ट्रीय सभेनें याप्रमाणें वर्तन करण्यांत चूक केली आहे असें कोणीही म्हणूं शकणार नाहीं. कॉंग्रेसचें हें धोरण चालविण्याच्या हेतूनेंच वर्किंग कमिटीनें जातिनिर्णयाचा तसा ठराव केला आहे. त्यांत तिनें कांहीं जास्त साधलें नाहीं अगर आपलें स्वत्वही गमाविलें नाहीं.

आपण आपल्या प्रयत्नानें ही जातिविषयक प्रश्नाची गुंतागुंत सोडवूं शकत नाहीं, याची प्रत्येक हिंदी मनुष्याला लज्जाच वाटली पाहिजे. हिंदुस्थानांत व इंग्लंडमध्यें अनेक प्रयत्न झाले,पण कोणालाच यश आलें नाहीं. याचीं कारणें उघड आहेत. आपल्या हातांत कोणत्याच प्रकारची सत्ता अगर अधिकार नसल्यामुळें आपल्याला तिसऱ्यावर विसंबावें लागतें. आणि अशाच त्रयस्थानें आपला हा जातिनिर्णय केला आहे. हा जातिनिर्णय कोणत्या परिस्थितींत घडून आला, ती प्रत्येकाला ठाऊक आहेच. गोलमेज परिषदेच्या हिंदी प्रतिनिधींचें आपसांत एकमत होईना,तेव्हां हें प्रकरण निर्णयासाठीं मुख्य प्रधानाकडे सोंपविण्यांत आलें. मुख्य प्रधानानें लगेंच गोलमेज परिषदेच्या अल्पसंख्यांक प्रश्नांच्या कमिटीकडून असें लेखी अभिवचन घेतलें कीं मुख्य प्रधानांचा हा निर्णय एकमुखानें मान्य करण्यांत येईल. मायनॉरिटीज कमिटीच्या बहुतेक हिंदु सभासदांनीं तशा प्रकारचें अभिवचन दिलें अशी माझी समजूत आहे. केवळ ह्या वचनावर विसंबूनच जातिनिर्णय देण्यांत आला, किंवा काय हें कळण्यास मार्ग नाहीं. हिंदी राष्ट्राला हें एक उघड उघड आव्हान आहे व सर्व राष्ट्राचें एकमत झाल्यास जातिनिर्णय फिरविला जाईल, असेंही एक त्यांत अभिवचन देण्यांत आलें आहे. आतांपर्यंत निदान येरवडा करारांत हें वचन पाळलें गेलें आहे. तेव्हां वर्किंग कमिटीच्या ठरावाचा विचार करतांना ही पार्श्वभूमि अवश्य घ्यावयास पाहिजे. वर्किंग कमिटीनेंच काय, पण राष्ट्रीय वृत्तीच्या सर्व पुढाऱ्यांनीं स्पष्ट व प्रखर शब्दांत जातीय निर्णयाचा निषेध

केला आहे. या निषेधांत वर्किंग कमिटीचाच पुढाकार होता हें सांगणें नकोच. कारण अराष्ट्रीय गोष्टींचा धिक्कार करणें हें तिचें प्रमुख कर्तव्यच आहे. जातिनिर्णयापासून किती घोर दुष्परिणाम होतील हें वर्किंग कमिटीइतकें दुसऱ्या कोणी ओळखलेलें नाहीं. हा निर्णय बदलण्यांत आला पाहिजे व तो एकमुखानें बदलण्यांत आला पाहिजे. असें तिनें वारंवार प्रतिपादिलें आहे. एका जातीनें किंवा राष्ट्रांतील कांहीं जातींनीं कितीही खटाटोप केला तरी सरकार हा निर्णय बदलणार नाहीं, हें कॉंग्रेस जाणून आहे. कारण राष्ट्रांतील सर्व जातींच्या संमतीनच जर एकादा करार झाला तर सरकार आपला निर्णय बदलण्यास तयार आहे, तेव्हां अशा परिस्थितींत वर्कींग कमिटीचा ठराव मान्य नसणाऱ्यांची व कॉंग्रेसची स्थिति एकच आहे असें म्हटल्यास चालेल.

मुख्य प्रश्न असा आहे कीं, हा सलोख्याचा करार कोणी घडवून आणावयाचा ? हिंदूंना खूष करण्यासाठीं सरकार आपला जातिनिर्णय बदलावयास तयार आहे अशी जर आपण कल्पना करून घेतली तर आपल्यासारखे मूर्ख आपणच. आपला आतांपर्यंतचा अनुभव याच्या अगदीं उलट आहे. सर्व हिंदु व शीख या दोघांनीं एकमत करून जातिनिर्यण फेंटाळून लावला असें गृहीत धरलें,—आणि तसें होईल असें मला तरी वाटत नाहीं, कारण असेंब्लीसाठीं उभे रहाणारे हरिजन त्याला विरोध करतील हें समजणें चूक आहे—तरी मुसलमान, ख्रिस्ती, अँग्लोइंडियन, युरोपियन व इतर अल्पसंख्य जाति त्याला उलट आपला पाठिंबाच देत आहेत याचा विचार करावयास नको काय ? असेंब्लींत गोलमेजपरिषदेचीच पुनरावृत्ति होणार हें स्पष्ट दिसत आहे. मग हा निर्णय कसा बदलणार ?

पुष्कळदां असा प्रश्न विचारण्यांत येतो कीं जातिनिणय बदलून घेण्यासाठीं खुद्द कॉंग्रेस काय करणार आहे ? ज्यांना वर्किंग कमिटीचा ठराव मान्य नाहीं त्यांना कॉंग्रेसनें हाच प्रश्न विचारला

तर ते काय उत्तर देतील ? मुसलमानांना धाक दाखवून जर हा निर्णय बदलून घेतां येणार नाहीं, तर, त्यांचें मन वळवून, त्यांना प्रेमानें आपलेसें करून व जातिनिर्णय अराष्ट्रीय आहे हें त्यांना पटवून देऊन सामोपचाराचा अवलंब करणें एवढाच मार्ग शिल्लक रहात नाहीं काय ? वर्किंग कमिटीनें जातिनिर्णय मान्य केला आहे,हें म्हणणें साफ चूक आहे. तिनें तसें केलें नाहीं आणि हिंदु व शीख निर्णयविरोधी आहेत हें तिला माहीत असल्यामुळें ती तो मान्य करूं शकणार नाहीं. यावरून असें दिसून येईल कीं पं. मालवीय व श्रीयुत अणे यांच्या प्रमाणेंच वर्किंग कमिटीनें जातिनिर्णयाचा निषेध केला आहे. हा निर्णय बदलून घेण्यांत आला पाहिजे व तो सर्व पक्षांच्या संमतीनें बदलण्यांत आला पाहिजे, या अणेमालवीयांच्या मताप्रमाणेंच वर्किंग कमिटीचेंही मत आहे. या दोघांच्या मध्यें मुख्य वादाचा प्रश्न असा आहे कीं राष्ट्रीय सभावाल्यांचा या निर्णयाला विरोध आहे अशा आशयाचा असेंब्लींत ठराव पास करून घेणें कितपत आवश्यक आहे ? वर्किंग कमिटीचें असें मत आहे कीं, असा ठराव पास करून घेण्यानें कांहीं साध्य होणार नाहीं. कारण त्या निर्णयासंबंधीं लोकमत काय आहे तें स्पष्ट झालेलेंच आहे.शिवाय कॉंग्रेस ही देशांतील सर्व जातींची एकमेव प्रतिनिधि असल्यामुळें कोणत्याही जातीच्या हितसंबंधाचें रक्षण करणें हें तिचें कर्तव्य ठरतें. तेव्हां एकादी जात जर निर्णयाला संमति देत आहे तर तिच्यासाठीं हा निर्णय फेटाळून देणें इष्ट होणार नाहीं, असें वर्किंग कमिटीला वाटलें असावें.

वर्किंग कमिटीच्या ह्या भूमिकेवर निरनिराळया प्रकारांनीं हल्ले चढविण्यांत आले आहेत. एके ठिकाणीं असें प्रतिपादन करण्यांत आलें आहे कीं, कॉंग्रेस ही जरी लोकमताची प्रतिनिधि असली तरी तिनें पुढाकार घेऊन देशाला योग्य मार्ग दाखविला पाहिजे. आणि खरोखर पहातां प्रस्तुत ठिकाणीं वर्किंग कमिटीनें अगदीं हेंच केलें आहे.

तिनें आपली भूमिका स्पष्ट केली आहे व शिक्षण, सामोपचार व सलोखा या उपायांची योजना करण्याचा आपला विचार जाहीर केला आहे. दुसऱ्या ठिकाणीं असें म्हणण्यांत आलें आहे कीं काँग्रे- सची ही भूमिका एका जातिसमूहाला पसंत असली तरी इतरांना मान्य नसल्यामुळें त्यापासून कांहीं फलप्राप्ति होणार नाहीं. असें जर कोणी सिद्ध करूं शकला कीं, वर्किंग कमिटी किंवा असेंब्ली यांनीं जर हा निर्णय धुडकावून लावला तर तो सरकारकडूनही धुडकावला जाईल तर मात्र वर्किंग कमिटी दोषास पात्र होईल. सर्व जातींचें एक- मत झाल्याखेरीज हा निर्णय बदलला जाणार नाहीं, ही जोपर्यंत काळ्या दगडावरची रेघ आहे तोंपर्यंत वर्किंग कमिटीला असें धोरण ठेवल्याखेरीज गत्यंतरच नाहीं. —

राष्ट्रीय मुसलमान जातिनिर्णय मान्य करावयाला तयार नाहींत असें म्हणतात. मुसलमान समाज हा निर्णय स्वीकारावयाला तयार आहे, असें कोणी म्हणतांच प्रो. अब्दुल मजीदखान उसळून उठतात. ते याच्याही पुढें जाऊन म्हणतात, कीं वर्किंग कमिटीनें हा निर्णय धडधडीतपणें फेटाळून न लावण्यांत, मुसलमान समाजाची अप्रीति संपादन केली आहे. कारण या ठरावानें मुसलमानांच्या हक्कांचें किंवा हितसंबंधाचें संरक्षण होत नाहीं. अगर त्यांचा त्यापासून यत्किंचित् फायदाही नाहीं. अशी प्रखर राष्ट्रीय वृत्ति पाहिली म्हणजे आनंद वाटतो. आणि अशाच वृत्तींची उत्तरोत्तर वाढ होत जाईल, अशी वर्किंग कमिटीची अपेक्षा आहे. पण अत्यंत खेदाची गोष्ट कीं आज मुसलमान बहुजन समाजाची वृत्ति प्रो. मजीदखान यांच्या- प्रमाणें नाहीं. मुसलमान समाजाचे लोकप्रिय व प्रतिष्ठित पुढारी वरीलप्रमाणें आपली मनोवृत्ति प्रगट करतील तर वर्किंग कमिटी आपला ठराव तत्क्षणींच मागें घेईल. जातिनिर्णय फेटाळून लावण्यास वर्किंग कमिटी एका क्षणाचाही अवधि लावणार नाहीं. मुसलमानांच्या

मनोवृत्तींत असा हितावह पालट घडवून आणण्याची खटपट करण्यास वार्किंग कमिटी तयार आहे. इतर जातींप्रमाणें मुसलमानांवर वार्किंग कमिटीचा विश्वास असल्यामुळें तिनें मुसलमानांना त्यांच्या कलाप्रमाणें वागण्यास मुभा दिली आहे.

मग कॉंग्रेसवर असा आक्षेप घेतला जातो कीं, कॉंग्रेस जर कोणत्याही जातीच्या विरुद्ध जात नाहीं, तर कोणालाही न विचारतां आपलें ध्येय व धोरण बदलण्याचा तिला काय अधिकार आहे ? तिनें स्वातंत्र्याची गर्जना केली तेव्हां कुठें तिनें मुसलमानांचा सल्ला घेतला होता ? अगर अस्पृश्योद्धाराची मोहीम सुरू करतांना तिला कांहीं हिंदु विरोधक भेटले होतेच कीं नाहीं ? पण या दोन गोष्टी अगदीं वेगळ्या आहेत. त्यायेगें जातीजातींत फाटाफूट होण्याचा प्रसंग येत नाहीं. एका मुसलमान पुढाऱ्याच्या चिकाटीमुळेंच स्वातंत्र्याचें ध्येय पुढें आलें व मद्रासच्या कॉंग्रेसमध्यें एका मुसलमानाच्या अध्यक्षतेखालींच कॉंग्रेसनें अगदीं पहिल्याप्रथम संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पसार केला. अलीबंधू किंवा मौलवी महंमद शफी दाऊदी इत्यादिकांनीं स्वातंत्र्याचा जयघोष कसा केला व आज ते जातीनिर्णयाबद्दल कसे वागत आहेत तें सर्वांस ठाऊकच आहे. अस्पृश्यतेच्या प्रश्नाला जरी कांहीं थोड्या हिंदूंचा विरोध असला तरी बहुजनसमाजाला ती चळवळ संमतच आहे. या विरोधी लोकांचें मतपरिवर्तन घडवून आणण्याचे प्रयत्न चालूच आहेत, पण या विरोधकांची कॉंग्रेसनें उपेक्षा केलेली नाहीं, हेंही ध्यानांत ठेवलें पाहिजे. कारण ह्या जातिनिर्णयाच्या ठरावांत अस्पृश्यतेचें सध्यांचें अस्तित्व मान्य करण्यांत आलें आहे.

पं. मदनमोहन मालवीय अगर श्रीयुत अणे यांच्यासारख्या महनीय पुढाऱ्यांच्या राजीनाम्याची कॉंग्रेसला किंमत वाटत नाहीं हें समजणें चुकीचें आहे. पंडितजींची अतुल देशसेवा व त्यांची कॉंग्रेसच्या जन्मापासूनची तिच्यावरील अनन्य निष्ठा या गोष्टी इतक्या

लोकोत्तर आहेत कीं कॉंग्रेसमधून त्यांना फुटण्याचा प्रसंग यावा हें देशाचें घोर दुर्दैव आहे, असेंच प्रत्येकाला वाटल्याखेरीज रहाणार नाहीं. केवळ नाईलाज म्हणूनच वर्किंग कमिटीला आपला निराळा मार्ग पत्करणें भाग पडलें आहे. जातिनिर्णय बदलून घेण्याच्या एका इच्छेनेंच अणे मालवीय कॉंग्रेसच्या बाहेर पडले आहेत. केवळ या जातिनिर्णयाच्या प्रश्नावरच त्यांचा मतभेद असल्यामुळें ते कॉंग्रेसला सोडून गेले आहेत. या प्रश्नावर मतस्वातंत्र्य देण्याची वर्किंग कमिटीनें तयारीही दाखविली होती. उमेदवारांना जर कॉंग्रेसच्या नांवावर निवडून यावयाचें आहे तर त्यांनीं स्वतःचीं मतें बाजूला ठेवून कॉंग्रेसच्या मताचा पुरस्कार करावयास नको काय ? कॉंग्रेसच्या उमेदवारांनीं एक गटानें कॉंग्रेसची बाजू संभाळली पाहिजे. प्रत्येकाला प्रत्येक वेळीं जर मतस्वातंत्र्य देण्यांत आलें तर कोणत्याही पार्लमेंटरी संस्थेंत 'पक्ष' या स्वरूपांत कोणताही पक्ष उरणार नाहीं. पक्ष म्हटला कीं तेथें वैयक्तिक मत गुंडाळून ठेवावें लागतें. असें असूनही मतापेक्षां सदसद्विवेकबुद्धीचा प्रश्न जेव्हां पुढें उपस्थित झाला तेव्हां त्याला मान देण्याची वर्किंग कमिटीनें तयारी दाखविली.

अद्यापही त्या मतभेदाच्या काळोखांतून मार्ग निघण्याला अवसर नाहीं काय ? आणि यद्यपि मार्ग निघाला नाहीं तरी एकंदर निवडणुका परस्पर सलोख्यानें पार पडतील अशी आशा आहे. कारण दोघांत मतभेदाचा मुद्दा एकच आहे, बाकी मतैक्यच आहे. हें सगळें तात्पुरतें वादळ वादळ शमल्यावर हिंदुस्थानांत ऐक्याचें वातावरण उत्पन्न होऊन हिंदी स्वातंत्र्याचा सूर्य लवकरच उदयास येवो असें मी मनःपूर्वक इच्छितों.

### कॉंग्रेस व निवडणुका

ता. १ ऑक्टोबर १९३४ रोजीं पाटणा येथें जातीय निवाड्यावर भाषण करीत असतां राजेंद्रबाबूंनीं पुढील उद्गार काढले:—

" असेंब्लींत जातीय निवाड्याविरुद्ध फक्त ठराव पास करून जर तो निर्णय खरोखर रद्द झाला असता तर आपण स्वतः ताबडतोब पं. मालवीय यांच्या कार्यक्रमाला पाठिंबा दिला असता. जातीय निवाडा इतक्या सहजासहजीं रद्द होऊं शकेल, असा मला मुळींच भ्रम नाहीं. तेव्हां येत्या असेंब्लीच्या निवडणुकींत कॉंग्रेसच्या उमेदवारांनाच मतें देऊन कॉंग्रेसच्या कार्यक्रमाला पाठिंबा द्या. ज्या वेळीं देशांत लढा चालू होता, त्यावेळीं असेंब्लींतल्या प्रतिनिधिंनीं लोकमताला धाब्यावर बसवून जनतेंत उत्पन्न झालेल्या स्वातंत्र्याच्या बीजाचें निर्मूलन करण्याकरितां सरकारनें चालविलेल्या दडपशाहीच्या हत्यारांना पाजळण्यास त्यांनीं मदतच केली. हे जनतेचे प्रतिनिधी नव्हेत हे सांगणें जरूर आहे. तेव्हां देशाच्या मागण्यांचा व गरजांचा असेंब्लींत विचार व्हावा, असें जर वाटत असेल, तर देशाकरतां ज्यांनीं हालअपेष्टा सोसल्या आहेत, अशाच कॉंग्रेस प्रतिनिधींना तुम्ही निवडून देणें जरूर आहे. कॉंग्रेसच्या उमेदवारांना पाठिंबा देऊन पूर्वींप्रमाणेंच कॉंग्रेसला आणीबाणीच्या वेळीं सहाय्य करा...... जातीय निवाडा हा अराष्ट्रीय असून त्यांत शक्य तितक्या लवकर सुधारणा घडवून आणावयास पाहिजेत. ही कॉंग्रेसची व तिच्या टीकाकारांची भूमिका सारखीच आहे. पण या दुरुस्त्या कोणत्या पद्धतीनें घडवून आणाव्यात, यासंबंधानें फक्त मतभेद आहेत. पण या बाबतींत प्रामुख्यानें एक गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे कीं, जातीय निवाड्यांत ज्या ज्या जातींविरुद्ध अन्याय करण्यांत आला आहे, त्यांनीं स्वतःची जबाबदारी ओळखून परस्परांना संमत असेल अशी दुरुस्ती करवून घ्यावयास पाहिजे. तेव्हां अशा परिस्थितींत ब्रिटिश सरकारला दुरुस्ती करण्याला सांगणें योग्य होणार नाहीं. जातीय निवाड्यांत दलित वर्गाला बऱ्याच ठिकाणीं अन्याय करण्यांत आला आहे. पं.

मालवीयांना असें वाटतें कीं जर जातीय निवाडा राष्ट्रविरोधी आहे तर तो फेंटाळून लावण्यांत कॉंग्रेसनें कुचराई कां करावी? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं नुसती फेंटाळण्याची जाहीर भाषा वापरून किंवा त्याबावत सरकारकडे जाऊन जातीय निवाडा फेंटाळला जात नाहीं. पण पं. मालवीयांनीं जर असें सुचविलें असतें कीं आपण मुसलमानाशीं झगडून त्यांच्या संमतीनें हा निवाडा दुरुस्त करूं तर ती गोष्ट निराळी होती. आणि पं. मालवीय यांच्या मनाप्रमाणेंसुद्धां या बाबतींत एकच मार्ग आहे. तो म्हणजे समेट घडवून आणण्याचा. हा समेट घडवून आणतांना तंटेबखेडे माजविणारे मुद्दे होतां होईल तों टाळावयास पाहिजेत, ही गोष्ट निर्विवाद आहे. पण पं. मालवीय यांच्या पद्धतीनें हा समेट घडवून आणावयाचा म्हणजे त्यांत जास्तच अडचणी उत्पन्न होण्याचा संभव आहे. म्हणून आपण सर्वांनीं कॉंग्रेसच्याच धोरणाला पाठिंबा देणें जरूर आहे. येत्या निवडणुकींमध्यें कॉंग्रेसला कितपत यश येतें, या गोष्टींकडे सर्व जगाचें लक्ष लागलें आहे. कॉंग्रेसच्या शत्रूंनाही पूर्णपणें जाणीव आहे कीं सुरळितपणें राज्य चालविण्यास जर कोणी आडवें येत असेल तर ती कॉंग्रेसच होय. आणि येत्या निवडणुकींत जर कॉंग्रेस यशस्वी झाली तर हिंदी लोक आपल्या राज्यपद्धतीविरुद्ध आहेत, असें राज्यकर्त्यांना पूर्णपणें दिसून येईल. जर कॉंग्रेस उमेदवार अयशस्वी झाले तर तो कॉंग्रेसचाच पराभव होईल, आणि जनतेचा कॉंग्रेसवर विश्वास नाहीं असें त्यावरून सिद्ध होईल, आणि याकरितां आपला विश्वास कॉंग्रेसवर आहे, हें आपण जगाच्या निदर्शनास आणलें पाहिजे."

प्रकरण आठवें.

# राजेंद्रबाबू व लोकमत.

## ' माझे सहकारी '

"राजेंद्रबाबू हे माझ्या सहकाऱ्यांपैकीं एक उत्कृष्ट सहकारी आहेत. त्यांनीं मला केव्हांही बोलवावें, मी त्यांच्या सेवेस तयार आहे. हरिजन-कार्याप्रमाणेंच बिहारचें कार्य सर्वांचेंच आहे. पण परमेश्वरी सूत्राप्रमाणें मी हरिजनकार्याला जुंपलों गेलों व बिहारच्या संकट-निवारणाचें कार्य राजेंद्रबाबूंकडे आलें."

—महात्मा गांधी ( मार्च १९३४ ).

## बिहारचें आद्य दैवत

" राजेंद्रबाबू हे बिहारी जनतेचें आद्य दैवत असून उदात्त शील व असामान्य स्वार्थत्याग यामुळें सबंध देशाला त्यांच्याबद्दल आदर वाटतो. अशा थोर पुरुषाला ऑर्डिनन्सखालीं सहा महिन्यांची शिक्षा ठोठावण्यांत आली आहे. जेव्हां अशा लोकांना तुरुंगांत धाडण्यांत येतें, तेव्हां सरकारचाच जास्त तोटा होत असतो. सरकारला त्या पासून काय मिळतें ? कांहींसुद्धां नाहीं. उलट जनतेच्या असंतोषांत भरच पडते. श्री. राजेंद्रप्रसाद हे महात्मा गांधींच्या अत्यंत विश्वस्त

अनुयायांपैकीं एक असून कायावाचामनेंकरून अहिंसेचें आचरण करण्यांत गांधींच्या खालोखाल त्यांच्याशिवाय दुसऱ्या कोणाचीही गणना करतां येणार नाहीं. त्यांचें जनतेवर जसें कमालीचें नियंत्रण होतें तसा त्यांचा प्रभावही होता. आपल्या प्रांतांतील कार्यकर्त्यांच्या हृदयांत सेवा व त्याग यांचें बीजारोपण करून त्यांनीं ऐन आणी-बाणीच्या वेळीं त्यांच्याकडून अहिंसा धर्माचें पालन करविलें. "

—लीडर, अलाहाबाद. (१०।७।१९३०).

## पस्तीस वर्षांपूर्वीं

" जे बाबू राजेंद्रप्रसाद आज येवढे प्रसिद्धीस आले आले आहेत, त्यांचें ३५ वर्षांपूर्वीं नांवसुद्धां कोणास ठाऊक नव्हतें. त्यावेळीं ते शाळेंत शिकत असून मॅट्रीकही झाले नव्हते. पण आज एका शब्दा-सरशीं ते बिहारभूकंप फंडासाठीं २५ लाख रुपये जमवूं शकत आहेत. देशासाठीं त्यांनीं जो लोकोत्तर स्वार्थत्याग केला व राष्ट्रासाठीं आपल्या भरभराटीच्या वकिलीवर पाणी सोडलें यामुळें त्यांना ' त्यागमूर्ति ' म्हणणें अधिक उचित होईल. त्यांचें चारित्र्य, त्यांची कार्यनिष्ठा व त्यांचा स्वार्थत्याग, या गुणांनीं राजेंद्रबाबूंच्या मोठेपणाचा पाया घातला आहे "

—हिंदुस्थान रिव्ह्यू, पाटणा. ( जुलै १९३४.)

## राजेंद्रबाबूंची लोकप्रियता

" राजेंद्रबाबू होते म्हणूनच भूकंपग्रस्तांच्या दुःखनिवारणाचें एवढें काम झालें. त्यांनीं मदतीसाठीं विनंति करतांच सबंध देशांतून त्यांच्याकडे द्रव्याचे प्रवाह वाहूं लागले. बाबू राजेंद्रप्रसादांची लोक-प्रियता केवढी आहे याचा हा स्पष्ट पुरावा आहे. तुरुंगांतून बाहेर पडतांक्षणींच एक क्षणाचाही विसावा न घेतां त्यांनीं हें संकटनिवा-रणाचें कार्य आपल्या हातीं घेतलें, व तें यशस्वी करून दाखविलें.

—स्टेट्स्मन, कलकत्ता

## दीनबंधु

" बिहारच्या भूकंपपीडित भागांत हिंडत असतां वेळोवेळीं माझ्या डोळ्यांपुढें एक व्यक्ति उभी राहात होती. ती व्यक्ति म्हणजे बाबू राजेंद्रप्रसाद. राजेंद्रबाबू हा राष्ट्राचा बहुमोल ठेवा आहे–राष्ट्राचा एक आधारस्तंभ आहे. शरीरप्रकृति दुर्बळ असतांही त्यांनीं दीन दुःखितांची मोठीच सेवा केली आहे. अशा भयंकर आपत्तीच्या वेळीं राजेंद्रबाबू नसते तर बिहारची काय स्थिति झाली असती कोणास ठाऊक ?

––बाबू संतोषकुमार बसू, कलकत्याचे मेयर

( ११–२–३४ )

## कॉंग्रेसचे अध्यक्ष

" हल्लींच्या लोकशाहीच्या काळांत प्रसिद्धीला अतिशय महत्त्व आहे. ज्यांचें नांव नेहमीं वर्तमानपत्रांत झळकतें त्यांचीच कॉंग्रेसच्या अध्यक्ष-पदासाठीं निवड होणें बहुधा अपरिहार्य असतें. पण प्रसिद्धीसाठीं न धडपडतां एका बाजूला राहून विधायक कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांची नांवें सुचविणें हें वास्तविक पहातां वर्तमानपत्रांचें काम आहे. या कार्य-कर्त्यांचा यथार्थ गौरव व सन्मान करणें हें राष्ट्राचें कर्तव्य आहे. अशा मूक कार्यकर्त्यांत राजेंद्रबाबूंची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. संघटना-शक्ति, स्वार्थत्याग, बुद्धिमत्ता व विधायक कार्य या दृष्टीनें पहातां कॉंग्रेसच्या अध्यक्षाच्या जागीं बाबू राजेंद्रप्रसाद याखेरीज दुसरी कोणी लायक व्यक्ति दिसत नाहीं."

—मॉडर्न रिव्ह्यू ( सप्टेंबर १९२९ )

## राष्ट्राचा गौरव

" बिहारच्या लोकांना सहाय्य करण्याचा प्रश्न निकडीचा असला तरी आज राष्ट्रालाही राजेंद्रबाबूंच्या नेतृत्वाची जरूर असल्यामुळें

हिंदुस्थानांतील सर्व प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यांनीं त्यांचीच अध्यक्ष म्हणून निवड केली आणि मुंबईच्या स्वागत मंडळानेंही त्याच निर्णयावर शिक्कामोर्तब केलें. बाबू राजेंद्रप्रसाद यांनीं गेलें दीड तप राष्ट्राची अनेक तऱ्हेनें जी निस्सीम आणि स्वार्थत्यागपूर्वक सेवा केली आहे, त्या सेवेचा मान करण्यासाठींसुद्धां त्यांनाच कॉंग्रेसचें अध्यक्षपद देणें वाजवी होतें. पण यंदां त्यांचा मान करून ह्याच्यापेक्षांही अधिक मोठी जबाबदारी त्यांना अध्यक्षपद देऊन राष्ट्रानें त्यांचेवर टाकण्याचें ठरविलें आहे. जर्मनीचे माजी अध्यक्ष व सेनापति फॉन हिंडेन्बुर्ग यांनीं जर्मनी पराभूत झाला असतांना रणांगणावरील सैन्य परत आणून जर्मन राष्ट्राची एकजूट कायम राखण्याचें अत्यंत अवघड काम केलें, तशाच तऱ्हेचें अवघड काम बाबू राजेंद्रप्रसाद यांना करावयाचें आहे. महात्माजींचा नवीन खादीप्रधान कार्यक्रम बुद्धिमान वर्गाला पटवून देण्याच्या दृष्टीनें बाबू राजेंद्रप्रसाद यांना अध्यक्षपद देण्यांत आलें ही गोष्ट फारच चांगली झाली. महात्माजींच्या कार्यक्रमाबद्दलचें शंकाकुशंकाचें निरसन बाबू राजेंद्रप्रसाद यांना अधिकारवाणीनें करतां येणार आहे. महात्माजींच्या कार्यक्रमाबद्दल आज असंतुष्टता दाखविणाऱ्या बुद्धिमान वर्गांतूनच बाबू राजेंद्रप्रसाद हे पुढें आलेले आहेत. असहकारितेच्या चळवळीपासून त्यांनीं वकिली सोडून लोकसेवेस आपणांस सर्वस्वीं वाहून घेतलें आहे. असहकारितेच्या भारलेल्या वातावरणाला बळी पडून त्यांनीं वकिली सोडलेली नाहीं किंवा नाइलाज म्हणून पुढें लोकसेवा चालू ठेवली नाहीं. स्वराज्याचा प्रश्न सुटावयाचा असल्यास महात्माजींच्या मार्गानें गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं अशी त्यांची चंपारण्यांतील महात्माजींच्या कामागिरीनें खात्री पटवून दिली आहे. महात्माजींचें चंपारण्यांतील कार्य पाहूनच त्यांनीं लोकसेवेचें व्रत पत्करलें असें दिसतें. त्यांच्या ह्या लोकसेवेच्या मार्गांत त्यांनीं लोकांचा केवढा विश्वास संपादन केला आहे हें त्यांच्या

बिहारमधील प्रचंड कामगिरीवरून स्पष्ट होतें. तेव्हां महात्माजींच्या मार्गाबद्दल व कार्यक्रमाबद्दल अविश्वास प्रकट करणाऱ्या बुद्धिमान वर्गाला महात्माजींच्या मार्गाची सयुक्तता युक्तिवाद करून नव्हे, तर आपला अनुभव सांगून पटवून देण्यास मुंबई काँग्रेसला बाबू राजेंद्र-प्रसाद यांचेसारखा कर्ता अध्यक्ष लाभल्यामुळें महात्माजींच्या इच्छेप्रमाणें त्यांच्या कार्यक्रमास बुद्धिमान वर्गाकडून विचारपूर्वक पाठिंबा मिळेल यांत काय संशय !"

—नवा काळ, मुंबई

## काँग्रेसका सभापतित्व

"यह परम संतोष और प्रसन्नताकी बात है कि समस्त देशने आगामी काँग्रेस–अधिवेशनके सभापतित्वके लिए बिहाररत्न बाबू राजेंद्रप्रसादको वरण किया है। वास्तवमें सभापति-पदके लिये इसके बढकर उपयुक्त निर्वाचन और कोई हो ही नहीं सकता था। महात्मा गांधीके असहयोग–आन्दोलनरूपी मन्थनद्वारा देशमें जो कतिपय उज्ज्वल रत्न उपलब्ध हुए थे उनमें राजेंद्रबाबू अन्यतम है ! अपनी विद्याबुद्धि, प्रखर प्रतिभा और सबसे बढकर आदर्शत्याग, सत्यनिष्ठा और अमायिक चरित्रके कारण आप सभी दलों और विचारके लोगोंके समान रूपमें सम्मानभाजन बने हुए हैं। बाबू राजेंद्रप्रसाद महात्मा गांधीके अत्यन्त विश्वासपात्र निकटतम सहकारियोंमेंसे हैं। किन्तु विधिकी विडम्बना तो देखिये कि जिस काँग्रेसके अधिवेशनका आपको नेतृत्व करना होगा उसके सामने सबसे बढकर जो महत्वपूर्ण और साथ ही बिकट समस्या उपस्थित होगी वह है महात्माजीका काँग्रे-सके नेतृत्वसे पृथक हो जाना। फिर भी हमें आशा है कि अपनी असाधारण योग्यता कर्मकुशलता और महात्मा गांधीकी कर्मनीतिके प्रति अखण्ड निष्ठा द्वारा आप राष्ट्रीय महासभाके अधिवेशनका इस

रूपमें संचालन करेंगे जिससे कॉंग्रेसका नेतृत्व महात्मा गांधीके ही हाथोंमें रहे और कॉंग्रेसवादी पूर्ण आन्तरिकताके साथ उनके निर्दिष्ट पथका अनुसरण करें!"

—विश्वामित्र, कलकत्ता ( ऑक्टो. १९३४ )

## राजेंद्रबाबूंचें अभिनंदन

"निरनिराळ्या प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यांनीं मुंबईच्या कॉंग्रेसच्या अध्यक्षपदासाठीं बिहार प्रांताचें नामांकित पुढारी श्री. बाबू राजेंद्र-प्रसाद यांचें नांव सुचाविलें व कॉंग्रेसच्या स्वागत कमिटीनें ता. १९ रोजीं अखेर त्यांचीच निवड मान्य केली याबद्दल श्री. राजेंद्रबाबूंचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों. श्री. राजेंद्रप्रसाद यांनीं स्वतःच अध्यक्ष होण्याचें नाकारलें होतें व खान अब्दुल गफूरखान यांस निवडावें असें सुचाविलें होतें, परंतु लाहोर कॉंग्रेसनंतर ओरिसा प्रांतांत जी कॉंग्रेस भरणार होती, पण मध्यंतरीच्या चळवळीमुळें जी भरूं शकली नाहीं, त्या कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाची माळ श्री. राजेंद्रबाबूंच्या गळ्यांत पड-णार होती. म्हणून आतां मुंबईच्या कॉंग्रेसच्या अध्यक्षस्थानीं त्यांची नेमणूक होणेंच रास्त होतें. शिवाय १९२० सालीं वकिली सोडल्या-पासून व राष्ट्रकार्यास वाहून घेतल्यापासून त्यांनीं जी अव्याहत व विविध राष्ट्रसेवा केली आहे ती ध्यानीं घेऊन कृतज्ञताबुद्धीनें त्यांसच हा मान देणें सर्वस्वीं योग्य होतें. बिहार कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष, बिहार प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष व १९२२ सालाच्या गया कॉंग्रेसच्या स्वागत कमिटीचे अध्यक्ष होण्याचा मान राष्ट्रानें त्यांस यापूर्वीच दिलेला आहे. यंदा त्यांच्या हातीं कॉंग्रेसचीं सर्व सूत्रें देण्याचें राष्ट्रानें ठरविलें हें यथायोग्यच झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं."

—केसरी, पुणें.

## हमारा राष्ट्रपति.

"साधु राजेन्द्र, महात्मा गांधी की तरह, कोई प्रगट तत्वज्ञान नहीं है, तोभी बिहार की भूमिमें, राजेन्द्रप्रसादजी ने, भगवान बुद्धकी प्रेरणाके वरदान स्वरूप, अपने में अजातशत्रुता पाई है । राजेंद्रबाबू कडवा शब्द तो राष्ट्रके महान शत्रूसे भी नहीं बोल सकते, किंतु राष्ट्रोत्थान के कार्यमें उनकी शक्तिकी बाढको, उनकी ठंडी ताकतको कोई रोक नहीं पाता । राजेंद्रप्रसाद उन आत्माओ में से है जो हिन्दी भाषा और हिन्दी संसारको अपने अस्तित्व से गौरवान्वित किये हुए है । देशमें, राजेंद्रप्रसाद एक व्यवस्थित राष्ट्रीय आज्ञा, और निश्चित राष्ट्रीय-योजना–पूर्ति, तथा सच्ची क्रियाशीलता है । ऐसे व्यक्तिको बम्बई काँग्रेस के लिये सभापति चुनकर, राष्ट्रनें अपनी चुनाई की मानदण्ड की उज्वलता और उच्चता दिखाई है।

—कर्मवीर, खांडवा.

---

## प्रकरण नववें.

# उपसंहार.

### खाजगी जीवन

राजेंद्रबाबूंसारख्या सार्वजनिक व्यक्तींच्या खाजगी जीवनाबद्दल सामान्य जनतेला एक प्रकारचें कुतूहल वाटत असतें. त्यांची कौटुंबिक रहाणी कशी असते, ते आपल्या मुलाबाळांशीं कसे वागतात, त्यांचा दैनिक कार्यक्रम काय असतो वगैरे गोष्टी कळण्याबद्दल बहुजन समाजाला उत्कंठा असणें साहजिक आहे. कारण मनुष्याचें खरें व्यक्तित्व जर कोठें दृष्टीस पडत असेल तर तें त्याच्या घरीं दृष्टीस पडते, असा एक सिद्धांत आहे. पण राजेंद्रबाबूंसारख्या सार्वजनिक कार्याशीं एकरूप झालेल्या व्यक्तींचें वर्तन घरींदारीं एकच असतें. घराकडे ते निराळ्या भावनेनें पहातच नाहींत. त्यामुळें त्यांच्या अंतरंगाचें दर्शन घेण्याची ज्याला उत्सुकता असेल त्यानें राष्ट्रकार्यांत मग्न असलेल्या राजेंद्रबाबूंना अवलोकन करावें, म्हणजे त्यांचें व्यक्तिमत्व त्याला तेव्हांच कळून येईल. राजेंद्रबाबूंची एकंदर वागणूक पाहिली तर, ती एकाद्या सर्वसंगपरित्याग केलेल्या संन्याशाप्रमाणें आहे, असें दिसून येईल. आपल्याला घरदार, संसार,

मुलेंबाळें कांहीं नाहींत, राष्ट्र हेंच आपलें घरदार आहे, या वृत्तीनें ते वागत असतात. म्हणजे आपल्या कुटुंबावर किंवा कौटुंबिक जीवनावर त्यांनीं सर्वस्वीं पाणी सोडलें आहे, असें नाहीं. थेट महात्मा गांधींच्या रहाणीप्रमाणें त्यांची रहाणी आहे. स्त्रीपुत्रादिकांच्या व्यामोहांतून ते कधींच मुक्त झाले आहेत.

राजेंद्रबाबूंचा विवाह फार लहानपणीं झाला. त्या वेळीं त्यांचें वय फार तर १४ वर्षांचें असेल. राजेंद्रबाबूंचें वैवाहिक जीवन आरंभापासूनच सुखमय व आदर्शभूत आहे. त्यांना मृत्युंजयप्रसाद व धनंजयप्रसाद असे दोन चिरंजीव असून मृत्युंजयबाबूंचें वय आज २८ वर्षांचें आहे. त्यांनीं कांहीं दिवस महात्मा गांधींचें 'हिन्दी नवजीवन' व राजेंद्र॰ बाबूंचा 'देश' या वृत्तपत्रांत जबाबदार सहसंपादक म्हणून काम केलें आहे. ते बिहार विद्यापीठाचे पदवीधर आहेत. राजेंद्रबाबूंच्या कुटुंबांत त्यांची पत्नी, मुलें व सुना यांशिवाय एक विधवा बहीण आहे. महेंद्रबाबूंच्या मृत्यूपर्यंत दोघे बंधु एकेच ठिकाणीं अत्यंत सलोख्यानें रहात असत. महेंद्रबाबू होते तोंपर्यंत तेच घरचें सर्व पहात असत. राजेंद्रबाबूंना घरांत यत्किंचितही लक्ष देण्याची जरूरी नसे. वकिली सोडल्यानंतर राजेंद्रबाबूंचें उत्पन्न एकदम घटलें, पण त्यांनीं स्वतःच्या चरितार्थासाठीं राष्ट्रीय फंडातून कधीं एक पैसाही घेतला नाहीं. महात्मा गांधीं वगैरेनीं खूप आग्रह केला, पण दोघे बंधू अगदीं अढळ राहिले.

राजेंद्रबाबूंचें घराणें कुलीन व खानदानीचें असलें तरी नवीन आचारविचारांचा स्वीकार करावयाला त्या घराण्यानें सदैव अनुकूलताच दाखविली आहे. राजेंद्रबाबूंना सुधारक म्हणतां आलें नाहीं तरी त्यांची रहाणी सुधारलेली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. वेडगळ रिवाजांचा व अप्रयोजक चालीरीतींचा त्यांनीं केव्हांच त्याग केला आहे. त्यांच्या घरांत स्पर्शास्पर्शांचें-अस्पृश्यतेचें बंड नाहीं.

बिहारमध्यें पडद्याची चाल नामशेष करण्यांत त्यांनींच पुढाकार घेतलेला आहे. अर्थात् त्यांच्या घरांत पडदा नाहीं, हें सांगणें नकोच. त्यांची पत्नी फारशी शिकलेली नाहीं, तथापि स्त्रियांच्या चळवळींत त्यांचा बराच भाग असतो. परवांच्या सत्याग्रहाच्या चळवळींत त्यांनीं एकदां तुरुंगवासाचाही अनुभव घेतला आहे. राजेंद्रबाबूंची वडील बहीण श्रीमती भगवतीदेवी यानींही गेल्या चळवळींत भाग घेतला होता व त्यांना दोन वेळ शिक्षा झाली होती. पुरुषांच्या बरोबर खांद्याला खांदा लावून [स्त्रियांनींही राष्ट्रकार्यांत पडल्याशिवाय राष्ट्राचा उत्कर्ष होणार नाहीं,] असें राजेंद्रबाबूंचें मत आहे. आपल्या चिरंजीवांना लिहिलेल्या एका पत्रांत राजेंद्रबाबू म्हणतात, " देश की उन्नति तब तक नहीं हो सकती जब तक स्त्रीपुरुष दोनोंको शक्तियां मिलकर काम न करें ! "

## उपसंहार

राजेंद्रबाबू हे जात्या लढाऊ वृत्तींचे नाहींत. ते अत्यंत सत्वशील व शांत असून पुढें पुढें करणें किंवा प्रसिद्धीसाठीं धडपडणें या गोष्टी त्यांच्या स्वभावांतच नाहींत. एकनिष्ठेनें व शांतपणें कार्य करीत रहाणें हा त्यांचा स्वभावधर्म आहे. ते जसे उत्कृष्ट नेते आहेत तसे ते आदर्श अनुयायी ही आहेत. देशांतील इतर पुढाऱ्यांचा त्याग व राजेंद्रद्रबाबूंचा त्याग यांत महदंतर आहे. राजेंद्रबाबूंनीं केवळ सर्वस्वावर पाणी सोडलें नाहीं, तर अनाथांच्या सेवेसाठीं त्यांनीं आपला देह अर्पण केलेला आहे. त्यांच्या या त्यागाची महती कोण वर्णन करूं शकेल ? अशा दर्जाचे थोर पुढारी राष्ट्राला केव्हांही ललामभूतच होत. व त्यांच्यामुळेंच राष्ट्राचा भविष्यकाळ उज्जल होत असतो.

परिशिष्ट.

# चरित्रांतील महत्वाचे प्रसंग.

३ डिसेंबर १८८४—जन्म.

मार्च १९०२—मॅट्रिक—कलकत्ता युनिव्हर्सिटींत पहिला नंबर.

मार्च १९०६—बी. ए—पहिल्या वर्गांत पहिले आले.

ऑक्टोबर १९०६—बॅरिस्टरीसाठीं इंग्लंडची तयारी.
पण वडिलांच्या इच्छेसाठीं बेत राहिला.

डिसेंबर १९०७—एम. ए.—दुसरा वर्ग.

जुलै १९०८—मुझफरपुरच्या ब्राह्मण कॉलेजांत इंग्रजींचे प्रोफेसर.

जानेवारी १९०९—ब्राह्मण कॉलेजचे प्रिन्सिपॉल.

मार्च १९०९—वकिली करण्यासाठीं कलकत्त्याला प्रयाण.

जुलै १९०९—कलकत्त्याच्या सिटी कॉलेजांत अर्थशास्त्राचे प्रोफेसर.

मार्च १९१०—एल्‌एल्. बी.

एप्रिल १९१०—ना. गोखले यांजकडून भारतसेवकसमाजांत
आमंत्रण—वडील बंधूंच्या इच्छेसाठीं नकार.

ऑगस्ट १९११—कलकत्ता हायकोर्टांत वकिलीला सुरवात.

मार्च १९१४ ते १९१६—कलकत्त्याच्या लॉ कॉलेजांत प्रोफेसर.

मार्च १९१५—एल्‌एल्. एम्.—पहिल्या वर्गांत पहिले आले.

एप्रिल १९१६—पाटणा हायकोर्टांत वकिलीला प्रारंभ.

जानेवारी १९१७—महात्मा गांधींसह चंपारण्यांत दौरा.

१९१७—१८—चंपारण्यांत.

ऑगस्ट १९२०—काँग्रेसच्या ठरावाप्रमाणें वकिली सोडली.

६ जानेवारी १९२१—बिहार विद्यापीठाची स्थापना.

१९२२–२८–विधायक राजकारण–खादीचा प्रचार.
राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य इ.
१९२८—शेतकऱ्यांची सेवा करण्यासाठीं ब्रह्मदेशांत प्रयाण.
मार्च १९२८—खटल्याच्या कामासाठीं विलायत यात्रा.
५ जुलै १९३०—सत्याग्रहाच्या चळवळींत ६ महिन्यांची कैद.
४ जानेवारी १९३२—दुसऱ्या चळवळींत सहा महिन्यांची शिक्षा.
६ जानेवारी १९३३—१५ महिने तुरुंगवासाची सजा.
१७ जानेवारी १९३४—आजारीपणामुळें तुरुंगांतून सुटका.
२० जानेवारी १९३४— बिहार भूकंपनिवारणाचें कार्य.
३० सप्टेंबर १९३४— मुंबई कॉंग्रेसचे अध्यक्ष.
२१ ऑक्टोबर १९३४—कल्याणहून खास गाडींतून मुंबईस प्रयाण.

## मान–सन्मान

१९२०–बिहार प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष–मुंगेर.
१९२०–बिहार राजकीय परीषदेचे अध्यक्ष–भागलपुर
१९२१ ते १९३४–कॉंग्रेस वर्किंग कमिटीचे सभासद.
१९२२–कॉंग्रेसचे मुख्य चिटणीस.
१९२२–हिंदुमहासभेचे स्वागताध्यक्ष–गया.
१९२३–हिंदी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष –कोकोनाडा.
१९३३–बिहारप्रांतीय साहित्यसंमेलनाचे स्वागताध्यक्ष–पाटणा
१९२४–शहर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष–पाटणा.
१९२४–अखिल भारतीय कायस्थ परिषदेचे अध्यक्ष–जोनपुर.
१९२६–बिहारप्रांतीय हिन्दी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष–दरभंगा.
१९२७–संयुक्त प्रांतीय साहित्य संमेलनाध्यक्ष–गुरुकुल कांगडी.
१९३०–जगन्नाथपुरी कॉंग्रेसचे नियोजित अध्यक्ष.
१९३०–१९३१–कॉंग्रेसचे हंगामी अध्यक्ष.
१९३४–४८ व्या कॉंग्रेसचे अध्यक्ष-मुंबई.